**सुवर्ण पदक विजेती दिव्यांग खेळाडू कु.कांचनमाला पांडे यांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-१७१८/प्र.क्र.१००/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २० जुलै, २०१८.

**वाचा:**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.: क्रीडायो २०१२ /प्र.क्र १५८/१२/क्रीयुसे- २, दिनांक ०५.०२.२०१४.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१८/प्र.क्र ६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.

**प्रस्तावना -**

मॅक्सिको येथे पार पडलेल्या वर्ल्ड पॅरा स्विमींग चॅम्पियनशिप, २०१७ मध्ये सुवर्ण पदक प्राप्त करुन महाराष्ट्र राज्याचे नाव संपूर्ण जगात उज्जवल करणाऱ्या खेळाडू कु.कांचनमाला पांडे यांना रोख पारितोषिक देऊन गौरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मॅक्सिको येथे पार पडलेल्या वर्ल्ड पॅरा स्विमींग चॅम्पियनशिप, २०१७ मध्ये सुवर्ण पदक प्राप्त दिव्यांग खेळाडू कु.कांचनमाला पांडे यांना रु.१५.०० लक्ष (रुपये पंधरा लाख फक्त ) इतके रोख पारितोषिक मंजूर करण्यास एक विशेष बाब म्हणून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबीकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२०४- क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार (०९)(०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिक देणे (२२०४ ५३२१)-५० इतर खर्च” या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पित तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांनूसार, उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक विवि/शिकाना/३६१/१८, दिनांक १९.०७.२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२०११३७२०५९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.07.20 11:37:10 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे खाजगी सचिव.
३) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
४) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
९) लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
११) निवडनस्ती, क्रीयुसे-२